श्रीगणेशायनमः॥ श्रीसांबसदाशिवायनमः॥ ॥अथमूळस्तंभप्रारंभः॥
आतांनमूंदेवईश्वरु॥ जोगिरिजापतीमनोहरु॥ तोवंदीनमहेश्वरु॥ आद्य
पुरुष॥ १॥ ओंनमोजीसदाशिवा॥ सोहंमूर्तीपरमनत्वा॥ शिवाशंभुमहादेवा
॥ नमनमाझें॥ २॥ जयजयाजीगणनाथा॥ परमपुरुषाअव्यक्ता॥ ब्रह्मादि
कांकैलासनाथा॥ नकळेसितूं॥ ३॥ तूंनिर्विकारनिरंजना॥ विश्वव्यापका
जगज्जीवना॥ परमात्मासगुणा॥ तूंचिदेवा॥ ४॥ देवात्रिनयनाशंकरा॥ पं
चमुखपरमेश्वरा॥ आदिनाथाकर्पूरगोरा॥ निरंजनरूपा॥ ५॥ तुझियेअ
र्धांगीपार्वती॥ मुकुटींगंगारूपवती॥ गुणात्मासगुणमूर्ती॥ तूंचिदेवा॥ ६॥
ज्याचेंचंद्रललाटीं॥ तोतूंदशभुजधूर्जटी॥ शेषाचाहारकंठीं॥ वसतसेतुझे
॥७॥ अंगीविभूतीचेंउधळण॥ गजचर्मप्रावरण॥ ललाटींटिळाशोभाय
मान॥ दिसतसेतुझे॥ ८॥ तुझियेदक्षिणांगींचतुराननं॥ जन्मपावलाब्र-
ह्माजाण॥ वामभागींविष्णुनारायण॥ जन्मलापें॥ ९॥ ब्रह्माविष्णुमहेश॥

|| मूर्तीपरमहंस ॥ निहोंठायींझालासिईश ॥ परमेश्वरातूं ॥ १० ॥ कवणजाणेतुझी
खोली ॥ सप्तपाताळेंपाउलेंगेलीं ॥ वेदपुराणेंश्रमलीं ॥ पाह्यतांतुज ॥ ११ ॥ ए
कविसांस्वर्गावरी ॥ तुझामुकुटगात्रिपुरारी ॥ कवणजाणेतुझीथोरी ॥ देव
राया ॥ १२ ॥ ऐसाअलक्षअपरांपरु ॥ ब्रह्मादिकांअगोचरु ॥ तुझियेरूपा
चानिर्धारु ॥ नकळेकवणासी ॥ १३ ॥ पृथ्वीएवढीशाळुंका ॥ आकाशमूर्ती
लिंगदेखा ॥ नयाकैलासनायका ॥ पूजाकैसी ॥ १४ ॥ मेघमाळावर्षती ॥
तेंतुजस्नानगापशुपती ॥ नवलक्षतारांगणेंशोभती ॥ पुष्पेंतुज ॥ १५ ॥ ऐ
सादेवईश्वरु ॥ निरारंभीपरमेश्वरु ॥ तुझ्यास्वरूपाचानकळेपारु ॥ ब्रह्मा
दिकांसी ॥ १६ ॥ साहीजणेंभांडती ॥ अठराहीअनुवादती ॥ चारीवेदवर्णि-
ती ॥ भांडहोऊनियां ॥ १७ ॥ परीतूंलक्ष्यानयेसीकवणा ॥ भ्रांतीघातलीस
कळजना ॥ जगज्जीवनाईशाना ॥ साकारतूं ॥ १८ ॥ ऐशाबोबड्यावचनी ॥
म्यानमिलापशुपाणी ॥ आतांकरितसेविनवणी ॥ श्रोतयांसी ॥ १९ ॥ जोमी

अज्ञानसाबडा ॥ माझ्यामतीचा प्रकाश थोडा ॥ माझाबोलवांकुडा ॥ परिसावा
तुह्मीं ॥ २० ॥ तुह्मींश्रोतेसज्ञान ॥ महाभेदिकविचक्षण ॥ तुह्मापुढेंबोलतां व
चन ॥ मीभीतअसेंपैं ॥ २१ ॥ आतांतुह्मीकृपाकराल ॥ आणिचित्तदेवोनिप
रिसाल ॥ तरीमीबोलेनबोल ॥ अध्यात्मिक ॥ २२ ॥ याग्रंथानाममूळस्तंभ ॥
ईश्वरपार्वतीसंवाद ॥ यादोहींचाअनुवाद ॥ परिसावाश्रोतेंहो ॥ २३ ॥ पार्वतीहो
यपुसती ॥ शंकरदेवसांगती ॥ पिंडब्रह्मांडाचीस्थिती ॥ सांगेनआतां ॥ २४
ह्मणेआद्यपुरुष ॥ शास्त्रमार्गींचासौरस ॥ श्रीमहामायाप्रकाश ॥ दाविला
आतां ॥ २५ ॥ पैलकैलासशिखरीं ॥ पार्वतीसहितत्रिपुरारी ॥ आनंदेंपुस
तीझालीगौरी ॥ शंकरापती ॥ २६ ॥ करजोडोनिकरीविनंती ॥ अहोजीदेवा
निजमूर्ती ॥ निराकाराचीस्थिती ॥ सांगास्वामी ॥ २७ ॥ निराकाराचियाखुणा
॥ सांगाजीदेवात्रिनयना ॥ कैसीझालीरचना ॥ चराचरहे ॥ २८ ॥ तंवदेवह्मणे
शूळपाणी ॥ ऐकेंदेवीचित्तदेउनी ॥ प्रथममूळारंभापासोनी ॥ सांगेनतुज ॥ २९

हेंपवनआणिपाणी ॥ आकाशआणिमेदिनी ॥ चंद्रसूर्यदोन्ही ॥ तेहीनव्हते ॥ अ
॥ ३० ॥ नाहींस्वर्गएकवीस ॥ जन्मनाहींसप्तपाताळांस ॥ मेघमाळानक्षत्रांस १
॥ ठावनाहीं ॥ ३१ ॥ नवतींअष्टोत्तरशेंतीर्थें ॥ नवतींपंचमहाभूतें ॥ अवघेंशू
न्यचिहोतें ॥ निराकारीं ॥ ३२ ॥ नाहींसप्तसमुद्र ॥ नव्हतेपर्वतमहेंद्र ॥ ब्रह्मा
विष्णुआणिरुद्र ॥ तिन्हींदेवनव्हते ॥ ३३ ॥ नाहींमनबुद्धिअहंकारु ॥ चित्त
चैतन्यविकारु ॥ सप्तद्वीपेंमेरुमांदारु ॥ तेहीनव्हते ॥ ३४ ॥ नाहींरूपनाहींबिं
ब ॥ कळाज्योतीवर्णभेद ॥ नव्हतेवाचाशब्द ॥ होतेंनिःशून्य ॥ ३५ ॥ नाहींआ
पतेजपृथ्वी ॥ नाहींआकाशव्योमी ॥ तेंनिराकारब्रह्मीं ॥ वर्त्ततअसे ॥ ३६ ॥
नव्हतीयाचाक्षीरवाणी ॥ शास्त्रेंपुराणेंवेदवाणी ॥ सकळब्रह्मचिहोउनी ॥
निराकारअसे ॥ ३७ ॥ ऐसेंअवघेंनिराकार ॥ त्यामाजीएकओंकार ॥ मजपा
हतांसाकार ॥ त्रिभुवनहें ॥ ३८ ॥ मीतोचिनिराकारु ॥ शून्यमुळारंभींपरमे २
श्वरु ॥ मजपाहतांथोरु ॥ आणीकनाहीं ॥ ३९ ॥ शून्यनेंचिआकारलें ॥ स्वयें

ब्रह्मविस्तारलें ॥ माझेंस्वरूपआलें ॥ व्यक्तिसीदेवी ॥ ४० ॥ तंवह्मणतसेगि-
रिजा ॥ अहोजीदेवाशंभुराजा ॥ विवंचनाकरोनिवोजा ॥ सांगास्वामी ॥ ४१ ॥
पांचांतत्वाचीरचना ॥ सांगाजीवना ॥ कवणतत्वकवणा ॥ पासूनोझालें ॥ ४२
मगईश्वरबोलती ॥ परियेसींगिरिजेशक्ती ॥ पंचभूतांचीउत्पत्ती ॥ सांगेनआ
तां ॥ ४३ ॥ प्रथमशून्यब्रह्मींपासूनी ॥ आकाशझालेंतेथुनी ॥ तेंसर्वव्यापुनी
॥ होऊनिठेलें ॥ ४४ ॥ शून्यव्यालेंगगनातें ॥ गगनव्यालेंवायूतें ॥ पवनव्यालेंतेजा
तें ॥ जाणिजेसू ॥ ४५ ॥ तेजव्यालेंआपातें ॥ आपव्यालेंपृथ्वीतें ॥ तेसींपांचहीभू
तें ॥ जन्मलींपाहीं ॥ ४६ ॥ ऐसींपांचभूतेंविस्तारलीं ॥ एकएकातेंप्रसवलीं ॥ तेंपा
सूनीझालीं ॥ भूतसृष्टी ॥ ४७ ॥ आधींपंचभूतिकरचिलें ॥ मगहेंचराचरझालें ॥
परमतत्वविस्तारलें ॥ सर्वांठायीं ॥ ४८ ॥ परमतत्वजाण ॥ माझेंनिजरूपप्रमा
ण ॥ तेंपांचाचेंजन्मस्थान ॥ प्रथमतत्व ॥ ४९ ॥ तेंपांचातत्वाचेंमूळ ॥ तेंपरमत
त्वकेवळ ॥ तयापासूनसकळ ॥ तत्वेंझालीं ॥ ५० ॥ तंवहिमवंताचीकुमरी ॥

मू·स्तं· पार्वतीविनतीकरी ॥ ह्मणेईश्वराअवधारी ॥ प्रश्नमाझा ॥ ५१ ॥ यापांचांतत्वांचें अ
३ उत्पन्न ॥ तुह्मींसांगीतलेंस्फलक्षण ॥ आतांपांचांचेपंचवीसगुण ॥ सांगेंजोगी १
॥ ५२ ॥ एकएकतत्वांचाविस्तारु ॥ आह्मांसांगाजीनागरु ॥ नोदारववाजीपद
रेंपदरु ॥ उकलोनियां ॥ ५३ ॥ मगह्मणितलेंजगन्नाथें ॥ गोरीपरियेसीएकचि
त्तें ॥ येथचिविवंचनातुतें ॥ सांगिजेल ॥ ५४ ॥ एकएकापासोन ॥ झालेपांचपां
चगुण ॥ एसेपंचवीसमिळोन ॥ शरीरहें ॥ ५५ ॥ याशरीराभीतरी ॥ गुणवर्तती
परोपरी ॥ तेसांगिजेतीलअवधारी ॥ ऐकगिरिजे ॥ ५६ ॥ अस्थीनाडीमांस ॥
त्वचाआणिकेश ॥ ऐसेहेपांचगुणपरियेस ॥ पृथ्वींततत्वाचे ॥ ५७ ॥ लाळशु
क्लशोणित ॥ मूत्रश्लेष्माविस्थांत ॥ हेपांचगुणनिभ्रांत ॥ आपतत्वाचे ॥ ५८ ॥
क्षुधातृषाआळस ॥ निद्रापांचवेंस्फुरव ॥ हेपांचगुणदेख ॥ तेजतत्वाचे ॥ ५९
चळणवळणआकोचन ॥ पसरणनिरोधन ॥ हेपांचगुणजाण ॥ वायोतत्वाचे ३
॥ ६० ॥ जनलज्जामोहाभये ॥ रागशांतहोये ॥ हेपांचगुणपाहें ॥ आकाशतत्वा

चे ॥ ६१ ॥ ऐसा पांचतत्वांचा विस्तार ॥ पंचवीसगुणाचा प्रकार ॥ सांगीतला निर्धार
॥ गिरिजे देवी ॥ ६२ ॥ तंव आणीक पुसे पार्वती ॥ देवा अवघीं तत्वें किती ॥ त्याची फेडा
वी भ्रांती ॥ प्राणनाथा ॥ ६३ ॥ मग ह्मणती देव महेश ॥ देवी अवघीं तत्त्वें छत्तिस ॥
म्यां तुज सांगीतलीं तीस ॥ आणिक साहा असती ॥ ६४ ॥ यावरी ह्मणितलें उमे
न ॥ देवा साहा तत्वें तीं कवण ॥ राउळें करावें निरोपण ॥ कृपाबुद्धी ॥ ६५ ॥ मग ह्म
णती अनादिसिद्ध ॥ शब्द स्पर्श रूप रस गंध ॥ हे पांच गुण प्रसिद्ध ॥ जाण देवी
॥ ६६ ॥ शब्द गुण आकाशाचा ॥ स्पर्श गुण वायोचा ॥ रूप गुण तेजाचा ॥ जाणि
जेसु ॥ ६७ ॥ रस गुण आपाचा ॥ गंध गुण पृथ्वीचा ॥ ऐसा पांचतत्त्वांचा ॥ विस्ता
र देवी ॥ ६८ ॥ गिरिजे हे पांचांचे पंचतीस ॥ ऐसीं झालीं पंचतीस ॥ छत्तिसावें त
त्व परियेस ॥ अगोचर तें ॥ ६९ ॥ प्रेमतत्व छत्तिसावें जाण ॥ अवघियां तत्वांचें
मूळस्थान ॥ तें श्रीगुरुकृपेविण ॥ नेणिजे पैं ॥ ७० ॥ ऐसा छत्तिसां तत्वांचा मेळा
॥ हा पिंड रचला गोळा ॥ तंव हिमवंताची बाळा ॥ आणीक पुसे ॥ ७१ ॥ ह्मणे

शंभुउमारमण॥ आत्मविधीऐकेंचित्तदेउन॥ तंवपार्वतीकायप्रश्न॥ कारतीझा
ली॥ ७२॥ नंवआयशक्तीअंबिका॥ पुसेकैलासनायका॥ हेपिंडाचीरचणुका॥
सांगास्वामी॥ ७३॥ अहोजीदेवाचंद्रमौळी॥ तूंव्यापकसकळी॥ मजसांगावीग
र्भावळी॥ कृपाकरोनी॥ ७४॥ मगह्मणतीत्रिपुरारी॥ देवीएकाग्रमनकरी॥ हेपिं
डाचीउत्पत्तीअवधारीं॥ सांगेनतुज॥ ७५॥ स्त्रीपुरुषमिळती॥ आपुल्यास्वइ
च्छेंरमती॥ विनोदेंमैथुनकरिती॥ सुखभावें॥ ७६॥ आनदेंमैथुनकरितां॥ ब्रह्म
स्थानीबिंदुहोतां॥ तोमणिकुळमार्गीउतरतां॥ दिसेकेसा॥ ७७॥ दोघांचेंमैथु
नझालें॥ नळेंबिंदुउतरलें॥ तेगर्भकमळींप्रवेशले॥ जाऊनियां॥ ७८॥ तेथेंर
क्तबिंदुपवन॥ तिन्हीएकवटमिळोन॥ कमळामाजीत्रिगुण॥ मुसावलें॥ ७९॥
तयारजबिंदुचेआवरी॥ मुळींजन्मादिसेसुंदरी॥ मगसमरसेंआदरी॥ वाढोंला
गे॥ ८०॥ मेंदागर्भगोळाकार॥ दिवसेंदिवसवाढेअंकुर॥ वरीपडतसेतुषार॥
अमृताचा॥ ८१॥ स्वाधिष्ठानाउपकंठीं॥ मनीपुरानळवरीं॥ दोहींचासंपुष्टीं॥

पिंडवादतसे ॥ ८२ ॥ आतांकन्यापुत्रउपजे ॥ नपुंसकनिपजे ॥ तेंसांगेनसहजे
॥ परिसाजी ॥ ८३ ॥ मातेचेंशोणित ॥ आणिपितयाचेंरेत ॥ दोहींपासोनजन्मत
॥ शरीरहें ॥ ८४ ॥ जरीअधिकहोयशोणित ॥ उणेंहोयरेतादिक ॥ तरीतेथेंनिपजे
बाळक ॥ कन्यारत्न ॥ ८५ ॥ जरीआगळेंहोयरेत ॥ उणेंहोयशोणित ॥ पुत्रनिपजे-
निभ्रांत ॥ जाणिजेसा ॥ ८६ ॥ समभागेंरसपडे ॥ तेथेंनिपजेहिजडें ॥ नपुंसक
बापुडें ॥ जन्मपावे ॥ ८७ ॥ ऐसेगुणसांगतां ॥ विस्तारहोईलकथा ॥ मजगर्भकां
डींचीव्यवस्था ॥ सांगावीअसे ॥ ८८ ॥ आतांखुजेकुब्जेजामिने ॥ पिसेंबहिरेंआं
गहिणे ॥ उत्पत्तीयाचीलक्षणें ॥ परियेसाजी ॥ ८९ ॥ शक्तीनाहींशरीरीं ॥ दुश्चि
तपणेंमैथुनकरी ॥ तयेवेळेसंभवेजरी ॥ तरीखुजेंहोय ॥ ९० ॥ जनअन्नसेवि
जननी ॥ तोरसबेसेआंगींजाउनी ॥ तेठाईंहोउनी ॥ जामिनेंहोय ॥ ९१ ॥ याका
रणेतेलराइतींतिखटें ॥ राइतींलोणचींआंबटें ॥ तीवर्जावींदुर्घटें ॥ गर्भिणी
सी ॥ ९२ ॥ घूर्मिवंतअसती ॥ निजसुरींमैथुनकरिती ॥ तेथेंराहेतरीहोती ॥ पि-

सींबाहिरीं ॥ ९३ ॥ स्त्रीपुरुषांमैथुनघडे ॥ कमळींजाउनीबिंदूपडे ॥ तेंदोहोंठायीं
वाढे ॥ तेणेंजाउळींहोती ॥ ९४ ॥ मातानेटेंचालत ॥ तेणेंपोटहबकत ॥ सर्वांग
स्रुकत ॥ तेणेंकुन्हेंहोय ॥ ९५ ॥ जरीसात्विकगुणेंरमती ॥ तेत्रिगुणगर्भासि
उठती ॥ तेथेंलेंकुरेंनिपजती ॥ सद्वासनेचीं ॥ ९६ ॥ जरीदुष्टगुणेंरमती ॥ ते
त्रिगुणगर्भासियेती ॥ तेथेंलेंकुरेंहोती ॥ खटेंनटें ॥ ९७ ॥ जेंनादाबिंदाझालीं
भेटी ॥ तेंचअक्षरघातलेंललाटीं ॥ आयुष्याचीयागणनागोष्टी ॥ तेंचजालि
या ॥ ९८ ॥ एकउपजतांपांगुळेंहोती ॥ एकगर्भआंधळेंउपजती ॥ तेपूर्वक-
र्मापासावहोती ॥ ऐसेंजाणिजेसु ॥ ९९ ॥ पूर्वीशुद्धपुण्यकीजे ॥ तरीनिकेंम
नुष्यदेहपाविजे ॥ त्रिविधभोगभोगिजे ॥ संसारींचे ॥ १०० ॥ पापास्तवहीन
देहलाहोनी ॥ हाजीवपावेपशुयोनी ॥ बहुदुःखीहोउनी ॥ कष्टभोगी ॥ १ ॥
आतांअसोइतुलें ॥ जेंतत्वसारबोलिलें ॥ तेंम्यांसांगीतलें ॥ मूळस्तंभीं ॥ ५
॥ २ ॥ स्वाधिष्ठानाउपरी ॥ नाभिस्थानामनिपुरीं ॥ दोहींचक्रामाझारीं ॥ पिं

डवादे ॥ ३ ॥ प्रथमशरीरीं आकारु ॥ पहिले मासीं गोळाकारु ॥ दुसरे मासीं शि
रु ॥ निपजनें झालें ॥ ४ ॥ तिसरे मासीं चंद्रसूर्यानें ॥ दोहीं जणें घातलें ठाणें ॥
प्रकाशले आपण ॥ रविशशी ॥ ५ ॥ चौमासीं करचरण ॥ शाखापल्लुव विस्ती
र्ण ॥ अस्थिशिरा सगुण ॥ रचना होय ॥ ६ ॥ पांचवीया मासामाझारी ॥ पंच
भूत आत्मा अवधारी ॥ परमहंस भीतरी ॥ सामावला ॥ ७ ॥ साहावे मासीं सा
हा चक्रें झालीं ॥ आंगोळिया सर्वांग निपजलीं ॥ मुख घ्राणें आलीं ॥ आकृती
सीं ॥ ८ ॥ सातवे मासीं सप्तधातू ॥ नखें केश झाले निभ्रांतु ॥ ऐसा पिंड रचतु ॥
आकार झाला ॥ ९ ॥ आठवे मासीं संपूर्ण ॥ झालें अष्टांग जाण ॥ अष्टतनु वि
स्तीर्ण ॥ जाणिया देखा ॥ ११० ॥ आतां शंखिनी नाळें संचरे शिउ ॥ सुषुम्ना द्वा
रें पैठा वेजिउ ॥ आह्मी वंकनाळें रसापिउं ॥ गर्भी असतां ॥ ११ ॥ जंव गर्भासि असे
ठाणें ॥ तंव सोहंमंत्र जपणें ॥ अहोरात्री उच्चारणें ॥ सोहंसोहं ॥ १२ ॥ आतां नव
व्या मासाची साउली ॥ नया गर्भावरी पडली ॥ मग प्रसूतव्यथा उदेली ॥ जननी

येसी ॥ १३ ॥ गात्रें ढिलीं झालीं ॥ द्वारें फांकलीं ॥ जननी आक्रंदों लागली ॥ गर्भि
णी ते ॥ १४ ॥ प्रसूतीचा वायो उदेला ॥ तेव्हां गर्भबंध सुटला ॥ मग लोटोनि आ
ला ॥ योनिद्वारें तो ॥ १५ ॥ द्वाराबाहेरी पडियेला ॥ ओंकार टाहो फोडिला ॥ जप
ध्यान विसरला ॥ मागील तें ॥ १६ ॥ कोहं कोहं करितु ॥ रुदन करी बहुतु ॥ लोच
न उघडोनि पाहतु ॥ भोंवताला ॥ १७ ॥ संसाराचा वायू लागला ॥ क्षुधा तृषा सं
चरला ॥ मायाजाळ पडियेला ॥ बिडाळिवरी ॥ १८ ॥ आधीं रचिलें पिंड ॥ मग र
चिलें ब्रह्मांड ॥ नव ही द्वारें नव खंड ॥ पृथ्वी हेचि ॥ १९ ॥ ऐसी गर्भावळीची स्थि
ती ॥ ईश्वर सांगे पार्वती प्रती ॥ शंकर ह्मणे वो शक्ती ॥ चित्त द्यावें ॥ २० ॥ नाना
शास्त्रींचे अंकुर ॥ निवडोनि काढिलें सार ॥ ग्रंथ केला मनोहर ॥ मूळस्तंभ ॥ २१ ॥
त्रिविध शास्त्रींचे तर्क ॥ जाणे तोचि व्यापक ॥ येर अधर्म मूर्ख ॥ काय जाणे ॥ २२
श्रीगुरु समर्थ कीजे ॥ तरीच आत्मतत्त्व जाणिजे ॥ मोक्षपदा पाविजे ॥ सायो
ज्यता ॥ २३ ॥ अध्यात्मशब्दाची गोडी ॥ स्वानुभवीं जाणती रोकडी ॥ आधा

रींचीवज्रनाडी ॥ बोलन असे ॥ २४ ॥ आतां असो तयागोष्टी ॥ उमाबोलेधूर्जे
टी ॥ करजोडोनीसंपुटी ॥ विनंतीकरी ॥ २५ ॥ पांचातत्वांचाविचारु ॥ मजसां
गाजीनागरु ॥ यांचावर्णमुख्य आहारु ॥ सांगास्वामी ॥ २६ ॥ तंवआद्यपुरु
षशंभु ॥ कायबोलिलाप्रभु ॥ निजमूर्तीनिळारंभु ॥ कायसांगे ॥ २७ ॥ पृथ्वी
आपतेजवायोजाण ॥ आकाशतेंचिगगन ॥ हींपांचतत्वेंजाण ॥ देहामाजी
॥ २८ ॥ पृथ्वीपर्वतजाणिजे ॥ आपश्वेतवर्णपाहिजे ॥ तेजरक्तवर्णसह्जे ॥
जाणदेवी ॥ २९ ॥ वायोतत्वनीळवर्ण ॥ आकाशकृष्णवर्णगहन ॥ हेपांचत
त्वांचेवर्ण ॥ सांगीतले ॥ ३० ॥ यांचीऐकामुखें ॥ सांगिजेतीविशेषें ॥ तीहीं
पाहिजेतीकौतुकें ॥ पिंडामाजी ॥ ३१ ॥ पृथ्वीचेंमुखजिव्हाजाण ॥ आपाचें
मुखइंद्रियेंगहन ॥ तेजाचेंमुखलोचन ॥ बोळखीजे ॥ ३२ ॥ वायोचेंमुखना
सिक ॥ आकाशाचेंमुखकर्णदेख ॥ आतांयाचाआहारसकरेख ॥ सांगिजेल
॥ ३३ ॥ पृथ्वीचाआहारषडरसअमृत ॥ आपाचाआहारबिंदुविख्यात ॥ ते

जाचाआहारनिभ्रांत ॥ देखणेंसर्व ॥ ३४ ॥ वायोचाआहारपरिमळ ॥ आका
शाचाशब्दजाणिजेसकळ ॥ ऐसापांचांतत्वांचाप्रकाशसबळ ॥ शरीरामाजी
॥ ३५ ॥ तंवह्मणतसेपार्वती ॥ अहोजीदेवापशुपती ॥ कवणतत्वाचाहातीं
॥ कवणशस्त्रआहे ॥ ३६ ॥ मगह्मणेदेवमहेश ॥ देवीबरवाकेलाप्रश्न ॥ पृथ्वी
चापरशअंकुश ॥ आपाचीसुरीपें ॥ ३७ ॥ तेजाचाभालाजाण ॥ वायोचेंखड्ग-
चोडण ॥ आकाशाचाबाण ॥ शस्त्रेंदेखा ॥ ३८ ॥ आतांपंचतत्वांचास्वादु ॥ सां
गेनभेदाभेदु ॥ ऐसानिवडोनिशब्दाशब्दु ॥ दाखवीतअसे ॥ ३९ ॥ पृथ्वीचा
स्वादमधुर ॥ आपगोडमनोहर ॥ तेजतिखटनिर्धार ॥ पाहेपांगिरिजे ॥ ४० ॥
वायोचास्वादआंबट ॥ आकाशाचास्वादकडवट ॥ हेस्वादबरवंट ॥ पंचतत्वां
चे ॥ ४१ ॥ आतांपांचतत्वांचेंपरिमाण ॥ सांगेननेंजाण ॥ मनकरीसावधान ॥
प्राणसखये ॥ ४२ ॥ आपअंगुळेंचारी ॥ तेजआठअंगुलेंअवधारी ॥ बाराअं
गुळेंनिर्धारी ॥ वायोतत्व ॥ ४३ ॥ सोळाअंगुळेंपृथ्वी ॥ वीसअंगुळेंव्योमी ॥ हें

गणितप्रमाणवर्मी ॥ बुझेंदेवी ॥ ४४ ॥ तंवअंबापुसेविनोदें ॥ सांगास्वामीआ
नंदें ॥ हेंकवणतत्वनांदे ॥ कवणियेघरीं ॥ ४५ ॥ पांचातत्वांचींघरें ॥ आह्मांसां
गाजीनिर्धारें ॥ कवणतत्वकवणियेद्वारें ॥ वावरतसे ॥ ४६ ॥ यावरीबोलेशंक
र ॥ देवीकाळजींपृथ्वीचेंघर ॥ मुखद्वारेंनिर्धार ॥ वावरेपृथ्वी ॥ ४७ ॥ आपाचें
घरनिळी ॥ इंद्रियांचेंनिर्जळी ॥ वावरतसेप्रबळी ॥ आपतत्व ॥ ४८ ॥ तेजा
चेंघरपीन ॥ ऐसेंजाणिजेनिभ्रांत ॥ नेत्रद्वारेंवावरत ॥ तेजतत्व ॥ ४९ ॥ वायूचें
घरफोपीसजाण ॥ नासिकद्वारेंपवन ॥ वावरतअसेगहन ॥ वायुतत्व ॥ १५० ॥
आकाशाचेंघरचुनाळ ॥ श्रवणद्वारेंनिश्चळ ॥ वावरतअसेआकाशनिर्मळ ॥
जाणिजेपें ॥ ५१ ॥ ऐसापांचातत्वांचाविचारु ॥ सांगितलाविवरु ॥ तंवआणी
कप्रश्नकरु ॥ आदरिलादेवियें ॥ ५२ ॥ तंवआदिशक्तीभवानी ॥ ह्मणेदेवाशू
ळपाणी ॥ पांचतत्वेंकवणियेस्थानीं ॥ सामावती ॥ ५३ ॥ साकारवोडंबरढिसा
ळ ॥ स्वर्गमृत्युपाताळ ॥ प्रळयहोतांसकळ ॥ कोठेंसामावती ॥ ५४ ॥ मगह्म-

गेत्रिपुरारी॥ बरवाप्रश्नकेलागोरी॥ साकारनिराकारीं॥ सामावनअसे॥५५॥ निराकारतेंआकारलें॥ अरूपतेरूपासिआलें॥ सर्वेचिविलयागेलें॥ आलेंअरूप॥५६॥ पृथ्वीतत्वआपेंविरालें॥ आपतेंसोखिलें॥ तेजपवनेंभक्षिलें॥ स्वभावेंचि॥५७॥ पवनहरपलेंगगनीं॥ गगनहरपलेंशून्यीं॥ ऐसीपांचांतत्वांचीसामावणी॥ निराकारींझाली॥५८॥ तत्वापासोनितत्वझालें॥ तत्वेंतत्वभक्षिलें॥ मागुतांहोउनिठेलें॥ निराकारीं॥५९॥ ऐसापंचतत्वांचाभेदु॥ सांगीतलाशब्दाशब्दु॥ पार्वतीप्रतीशब्दबोधु॥ निरोपिताझाला॥६०॥ ब्रह्मांडगोळकाचियाखुणा॥ बोलेकैलासराणा॥ आतांअध्यात्मीनिरोपणा॥ सांगिजेल॥१६१॥ इतिश्रीमूळस्तंब॥ ईश्वरपार्वतीसंवाद॥ दत्तात्रयअवधूत॥ अनुवादतअसे॥१६२॥ ॥ इतिप्रथमोध्यायसमाप्तः॥१॥ छ॥ छ॥ ॥

श्रीगणेशायनमः॥ ॥तंवहिमवंताचीबाळी॥पार्वतीह्मणेचंद्रमौळी॥आ
तांषड्चक्रांचीवोळी॥सांगास्वामी॥१॥पूर्वमार्गाचीविवंचना॥केसोपिप्यालि
केत्वेज्ञाना॥आतांषट्चक्राचियाखुणा॥सांगास्वामी॥२॥मगबोलेआद्यपु
रुष॥स्वयंज्योतीपरमहंस॥आतांअजपामंत्रउपदेश॥सांगेनदेवी॥३॥अ
धरतेंचगुह्यस्थान॥तेंचतुर्दळआरक्तवर्ण॥ऋषीईश्वरजाण॥तयेस्थानीं॥
॥४॥तेथेंदेवगणपती॥चारीपाकोळिकाशोभती॥तेथेंडाकिनीशक्ती॥वर्त
तअसे॥५॥साहाशतेंजपहोय॥गुणचारीवर्ततीपाहें॥चतुअंगुळेंउंचआहे॥
आधारचक्र॥६॥इतुकियाआधारिचीविवंचना॥आतांस्वाधिष्ठानाचियाखु
णा॥सांगेनरचना॥भेदाभेदु॥७॥स्वाधिष्ठानचक्रलिंगस्थान॥तेंतप्तकांच
नवर्ण॥सूर्यऋषीभान॥वर्ततअसे॥८॥तेंषट्दळकमळ॥तेथेंब्रह्माऋ
षीकेवळ॥सावित्रीशक्तिसुढाळ॥अर्धांगीवसे॥९॥साहासहस्त्रजपहोती
॥षड्गुणवर्तती॥साहापाकोळियाशोभती॥षड्दळीं॥१०॥साह्याअंगु

मू॰स्तं॰ ९ ळेंऊर्ध्वं ॥ स्वाधिष्ठान प्रसिद्ध ॥ मणिपुरींचे भेद ॥ सांगेन आतां ॥ ११ ॥ मणिपु अ॰ २
रनाभिकमळ ॥ तेथें श्यामवर्ण दशदळ ॥ विष्णुदेव निर्मळ ॥ नांदे तेथें ॥ १२
॥ लक्ष्मीशक्ती मिरवे ॥ दाहागुण वर्तती बरवे ॥ पवनऋषी स्वभावें ॥ वसे ते
थें ॥ १३ ॥ दाहा पाकोळिका शोभती ॥ दशअंगुळें ऊर्ध्व निगुती ॥ साहासह
स्त्र जप होती ॥ अहोरात्र ॥ १४ ॥ हें मणिपुरींचें ज्ञान ॥ आतां अनुहत सांगे
न ॥ आनंदें बोलेंन ॥ श्रीगुरुकृपे ॥ १५ ॥ अनुहत चक्र हृदयस्थान ॥ द्वाद
शदळ पीतवर्ण ॥ रुद्रदेव आपण ॥ नांदे तेथें ॥ १६ ॥ उमाशक्ति सुंदरी ॥ बा
रागुण वर्तती भीतरी ॥ इंद्रऋषी अवधारी ॥ तप करीत ॥ १७ ॥ द्वादश पा
कोळिका शोभती ॥ साहासहस्त्र जप होती ॥ बाराअंगुळें ऊर्ध्वगती ॥ अनु
हतचक्र ॥ १८ ॥ आतां विशुद्धीची स्थिती ॥ मी बोलेंन निगुती ॥ मन करोनि
एकचित्तीं ॥ परिसा जी ॥ १९ ॥ विशुद्ध चक्र कंठस्थान ॥ तें शुभ्रवर्ण गहन ॥ ९
तेथें लिंगदेव आपण ॥ राज्य करी ॥ २० ॥ तें षोडशदळ कमळ ॥ आद्यशक्ति

सदाळ ॥ सोळागुणनिश्चळ ॥ वर्तती तेथें ॥ २१ ॥ सहस्र एक होती जप ॥ अग्नि
ऋषी करी तप ॥ षोडश अंगुळें ऊर्ध्व साक्षेप ॥ विशुद्ध चक्र ॥ २२ ॥ सोळा पाको
ळिका तेथें ॥ ऐसें जाणिजे निरुतें ॥ श्रीगुरुप्रतापें नयातें ॥ सांगत असे ॥ २३ ॥
अग्निस्थानीचें खुण ॥ बोलिजेल तें जाण ॥ एकाग्र करूनियां मन ॥ ऐकपां तु ॥
॥ २४ ॥ तें अग्निचक्र भृगुस्थान ॥ परमहंस देव आपण ॥ इच्छाशक्ती गहन ॥ व
र्तें कैसी ॥ २५ ॥ दोन्ही दळें शोभती ॥ नयातें इडा पिंगळा ह्मणती ॥ दोहींमध्यें स
रस्वती ॥ सुषुम्ना बाळी ॥ २६ ॥ दोन्ही पाकोळिका शोभती ॥ दोहीं दळें वसती ॥
एक सहस्र जप होती ॥ अहोरात्रीं ॥ २७ ॥ तेथें हंस ऋषी असे ॥ स्थान नीळवर्ण दि
से ॥ दोन्ही गुण वर्तती कैसे ॥ नयेस्थानीं ॥ २८ ॥ द्वि अंगुळें ऊर्ध्व ॥ अग्निचक्र प्र
सिद्ध ॥ ऐसे साहां चक्रांचे भेद ॥ सांगीतले ॥ २९ ॥ आतां षट्चक्रावरी ॥ सातवें स
हस्रदळ अवधारी ॥ तेथींचा महिमा थोरी ॥ अगोचरपें ॥ ३० ॥ तें सहस्रदळ अ
गोचर ॥ अनंतप्रभा अपरांपर ॥ मस्तक ब्रह्मांड शिर ॥ ह्मणती नयातें ॥ ३१ ॥ तें

षट्चक्रांचेंमूळ॥ तेंसानवेंसहस्त्रदळ॥ तयापासूनसकळ॥ शरीरहें॥ ३२॥ तया सहस्त्रदळमाझारी॥ प्रेमगुरूदेवराज्यकरी॥ ज्ञानशक्तीसुंदरी॥ वर्ततेतेथें॥ ३३॥ जोनिराकारनिरंजन॥ निर्विकल्पनिर्गुण॥ तेंबोलिजेब्रह्मस्थान॥ सहस्त्रदळ॥ ॥ ३४॥ तेंसहस्त्रदळकमळीं॥ सहस्त्रवर्णप्रभावळी॥ तेथेंऋषीन्याहाळी॥ ज्ञानदृष्टी॥ ३५॥ स्वयंप्रकाशपरंज्योती॥ एकसहस्त्रजपहोती॥ आठमातृकाअसती॥ तयेस्थानीं॥ ३६॥ एवढीसहस्त्रदळींचीरवुण॥ मीबोलिलोंजोगहन॥ जोजाणेतो सज्ञान॥ अनुभवीया॥ ३७॥ सप्तचक्रांचींदेवतें॥ जपजपतीतेथें॥ एकवीससहस्त्रसाहाशतें॥ अहोरात्री॥ ३८॥ सप्तचक्रामाझारी॥ जपहोतसेनिरंतरी॥ एकवीससहस्त्रअवधारी॥ साहाशतेंपें॥ ३९॥ हेंआत्मज्ञानबोलणें॥ गिरिजेससांगीतलेंशंभुनें॥ पुनतीत्रिनयनह्मणे॥ परियेसाजी॥ ४०॥ इतिश्रीमूळस्तंभके॥ ईश्वरपार्वतीसंवादे॥ दत्तात्रयअवधूतआनंदें॥ अनुवादतअसे॥ ४१॥ १०

॥ ॥ इतिद्वितीयोध्यायसमाप्तः॥ २॥ छ॥ छ॥ छ॥ ॥

श्रीगणेशायनमः॥ ॥अहोजीअनेकशास्त्रेंपाहिलीं॥तेथेंजेंजेंदृष्टीपडलें॥तें
म्यासांगीतलें॥मूळस्तंभीं॥१॥ग्रंथींनाहींविस्तार॥सांगीतलेंअसेसार॥ना
नाशास्त्रांचेअंकुर॥निवडोनियां॥२॥देहशब्दीवांचुन॥मीनबोलेवचन॥तु
जप्रतीसांगेन॥प्राणप्रिये॥३॥आतांज्ञानचर्चा॥मीबोलेनवाचा॥पुत्रहोय
श्रीगुरूचा॥तोचिजाणे॥४॥आतांअसोतहेबोल॥जेंअध्यात्ममहारवोल॥
तेंगिरिजापुसेल॥शिवाप्रती॥५॥तंवपार्वतीह्मणेजीहरा॥माझीविनंतीअ
वधारा॥हापिंडप्राणेश्वरा॥केसासांगा॥६॥आतांत्रिगुणाचीस्थिती॥शंक
रदेवसांगती॥ऐकेसांगेनतुजप्रती॥प्राणप्रिये॥७॥सत्वरजतम॥बुझेंत्रि
गुणवर्म॥यातेंव्यापोनीपरब्रह्म॥वेगळेंचिअसे॥८॥रजींब्रह्माजाणिजे॥
सत्वींविष्णुह्मणिजे॥तमींमहेशाबोलिजे॥निर्धारेसी॥९॥रजतेंराजसदेख॥
सत्वतेंसात्विक॥तमतेंतामसप्रत्यक्ष॥जाणदेवी॥१०॥रजोगुणेंउपजणें॥
सत्वगुणेंप्रतिपाळणें॥तमोगुणेंसंहारणें॥सर्वांसीपैं॥११॥यात्रिगुणापा

सुनी॥ यादेहाचीउभवणी॥सत्वरजतमत्रिगुणीं॥शरीरहें॥१२॥आतांत्रि
गुणाचेवर्ण॥ कैसेतेसांगेन॥सत्वगोरेंजाण॥ प्राणसखिये॥१३॥रजतें
सांवळें॥तमतेंकाळें॥त्रिगुणसांवळें॥जालेंदिनमान॥१४॥प्रभातेरा
जसदेख॥माध्यान्हींसात्विक॥अस्तमानीतामससरिख॥जाणदेवी॥
॥१५॥यात्रिगुणापासुन॥हेंचालेदिनमान॥ऐसेंत्रिविधलक्षण॥सांगीत
लें॥१६॥परिआणिकएकअसे॥हापिंडत्रिगुणीदिसे॥कवणगुणवसे॥
कवणीयेस्थानीं॥१७॥रजोगुणस्वाधिष्ठानीं॥सत्वगुणनाभिभुवनीं॥त
मोगुणअनुहातस्थानीं॥ज्ञानीतोचिजाणे॥१८॥हेदेहींजाणावीखुण॥तं
वपार्वतीबोलेवचन॥करकमलजोडोन॥विनतीकरी॥१९॥यानादबिंदा
चेस्थान॥सांगास्वामीकवण॥पिंडींमनपवन॥कोठेंवसती॥२०॥याव
रीबोलेशूलपाणी॥एकेंगोरीचित्तदेऊनी॥नादबिंदुस्थानी॥वसतअसे ११
॥२१॥पैलब्रह्मांडशिखर॥नादबिंदाचेंघर॥शिरस्थानचक्र॥तयासि

बोलिजे ॥ २२ ॥ आतांमनपवनाचीवस्ती ॥ सांगिजेलनिगुती ॥ परियेसीप्राणश्री
क्ती ॥ प्राणेश्वरी ॥ २३ ॥ ह्रदयींवसेमन ॥ नाभींवसेपवन ॥ यादोहींपासोन ॥ शरी
रचाले ॥ २४ ॥ जंवहेपिंडींवसती ॥ मनपवननांदती ॥ तंवयादेहाचीगती ॥ चालतां
दिसे ॥ २५ ॥ तंवगिरिजापुसेंनिरुतें ॥ जैंह्रदयचिन्हनवतें ॥ मनकोठेंहोतें ॥ सांगा
स्वामी ॥ २६ ॥ अहोजीजगन्नाथा ॥ जेव्हांनाभीनव्हतीसर्वथा ॥ तेव्हांपवनकोठें
होता ॥ सांगास्वामी ॥ २७ ॥ मगबोलेईशान ॥ जेव्हांनव्हतेंह्रदयस्थान ॥ तेव्हां
शून्यामाजीमन ॥ होतेंदेवी ॥ २८ ॥ ऐसेंअभ्यंतरअवधारी ॥ जेव्हांनाभिगौरी ॥
तैंपवननिराकारीं ॥ होतातेथें ॥ २९ ॥ हेंआलेंजीमना ॥ मगबोलेमृगनयना ॥ आ
णीकपुसेन ॥ नेंसांगास्वामी ॥ ३० ॥ हेदेहींसप्तधातूकवणी ॥ शंकराप्रतीपुसेभवा
नी ॥ याचीविवंचनाकरुनी ॥ सांगास्वामी ॥ ३१ ॥ पितयाचेंबीज ॥ मातेचेंरेत ॥ या
दोहींपासोनीसहज ॥ सप्तधातू ॥ ३२ ॥ बापाच्याबीजापासोन ॥ आठधातूजाण
॥ मज्जाशिराअस्थिसगुण ॥ नरवेंदेरवा ॥ ३३ ॥ मातेच्यारेतापासोन ॥ आठधातू

मू·स्तं· जाण ॥ रक्तमांसत्वचारोमगहन ॥ जाणिजेसु ॥ ३४ ॥ ऐसासमथातूपिंड ॥ आठहा
१२ तअखंड ॥ नवहीद्वारेंनवखंड ॥ पृथ्वीतेचि ॥ ३५ ॥ तंवपार्वतीपुसेदेवासी ॥ नव
खंडांचीनावेंकैसी ॥ कवणखंडकवणीयदेशीं ॥ वसतअसे ॥ ३६ ॥ मगबोलेत्रि
पुरारी ॥ नवांखंडांचीकुसरी ॥ सांगेनअवधारी ॥ ऐकचित्तें ॥ ३७ ॥ भरतखंडभ्र
नखंड ॥ रम्यखंड द्राक्षेमाळखंड ॥ ऐकेंतूमाळखंड ॥ हरिखंडजाणिजेपें ॥ ३८
विधीवंशखंड ॥ हर्णखंड ॥ एवंपृथ्वीनवखंड ॥ जाणिजेदेवी ॥ ३९ ॥ नवद्वारेंगहन ॥
तेंचिनवखंडबोलणें ॥ हेंज्ञानबुझणें ॥ प्राणप्रिये ॥ ४० ॥ दाहावेंखंडकाशी ॥ तें
चिदाहावेंद्वारपरियेसी ॥ विश्वनाथदेवपरियेसी ॥ नांदनअसेतेथें ॥ ४१ ॥ पूर्वदि
शेभरतखंडअसे ॥ अग्निकोनीभ्रनखंडवसे ॥ दक्षिणेप्रकाशे ॥ रम्यखंड ॥ ४२
नैर्ऋत्यखंडाहारी ॥ द्राक्षमाळखंडअवधारी ॥ पश्चिमदिशेमाझारी ॥ केतुमा
ळखंडअसे ॥ ४३ ॥ वायव्यकोनीहरिखंड ॥ उत्तरेसविधिवंशखवड ॥ ईशान्येस
हरणखंड ॥ आठवेंजाण ॥ ४४ ॥ ऐशाअष्टदिशाहारी ॥ अष्टखंडअवधारी ॥ म

ध्येंसुवर्णखंडवसुंधरी ॥ वसेतेथें ॥ ४५ ॥ ऐसानवखंडांचाविचारु ॥ गिरिजेप्रती
सांगेशंकरु ॥ तंवआणीकप्रश्नकरूं ॥ आदरिलादेवी ॥ ४६ ॥ तंवह्मणलअसेभ
वानी ॥ देवात्रिनयनाशूळपाणी ॥ दशपवनकवणियेस्थानी ॥ वसतीदेहीं ॥ ४७
यापिंडामाझारी ॥ कवणपवनकवणियेघरीं ॥ नांदतअसतीत्रिपुरारी ॥ सांगा
मातें ॥ ४८ ॥ ऐसीऐकोनियांमात ॥ सांगताझालाजगन्नाथ ॥ गौरीपरियेसीवृ
त्तांत ॥ दशपवनाचा ॥ ४९ ॥ प्राणअपानउदान ॥ व्यानसमान ॥ हेपांचपवन ॥
स्थूळदेहीं ॥ ५० ॥ प्राणहृदयकमळीं ॥ अपानगुह्यमंडळीं ॥ व्यानवसेषट्द-
ळीं ॥ स्वाधिष्ठानीपें ॥ ५१ ॥ उदानवसेकंठीं ॥ समाननाभिकमळदेटीं ॥ गिरिजे
प्रतीधूर्जटी ॥ सांगताहोय ॥ ५२ ॥ यास्थूळदेहामाझारी ॥ कवणप्राणकरणी
करी ॥ तेंसांगेनहोअवधारी ॥ प्राणप्रिये ॥ ५३ ॥ प्राणदेहातेंसांवरी ॥ अपानम
ळमूत्रानेंकरी ॥ व्यानसर्वनाड्याव्यापूनगौरी ॥ राहिलाअसे ॥ ५४ ॥ इतिश्रीमू
ळस्तंभके ॥ ईश्वरपार्वतीसंवादे ॥ दत्तात्रयअवधूतआनंदे ॥ अनुवादतअसे ॥ ५५ ॥

॥ इतितृतीयोध्यायसमाप्तः ॥ ३ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥ छ ॥



श्रीशंकरायनमः ॥ ॥ उदानकोपलियायेकेकाळीं ॥ नशीजीवानेंविचली ॥ समा
ननाभिमंडळीं ॥ वर्ततअसे ॥ १ ॥ आतांनागकूर्मककेश ॥ देवदत्तधनंजयजा
णिजेस ॥ हापांचापवनाचाप्रकाश ॥ जाणदेवी ॥ २ ॥ नागवसेताकुकाकमळीं
॥ कूर्मनेत्रींन्या हाळी ॥ कर्कशुकर्णमंडळी ॥ लुब्धझालादेवी ॥ ३ ॥ देवदत्तमुखा
माझारींअसे ॥ धनंजयोनासिकींवसे ॥ हेपांचपवनकेसे ॥ ब्रह्मांडींअसती ॥
॥ ४ ॥ पांचपवनब्रह्मांडीं ॥ पांचपवनपिंडीं ॥ दाहापवनचंडमुंडी ॥ सांगीतलें
देवी ॥ ५ ॥ तंवपार्वतीपुसेआणिक ॥ उचकीजांभईशिंक ॥ त्याचेंकवणस्थान
क ॥ शरीरामाजी ॥ ६ ॥ एवदासाक्षेपगिरिजेचा ॥ स्फललितबोलवाचा ॥ हाआंग
मोडाकवणाचा ॥ सांगास्वामी ॥ ७ ॥ मगबोलेत्रिनयन ॥ उचकीउदानलिंगापासो
न ॥ येतअसेजाण ॥ प्राणप्रिये ॥ ८ ॥ देवदत्ताचीजांभई ॥ शिंकधनंजयाचीपा

हीं॥ ध्यानलिंगाच्याठायीं॥ आंगमोडा॥ ९॥ ऐसाशरीराचाअर्थ॥ गौरीशीसांगे आद्यनाथ॥ हेंऐकोनियांआनंदभरित॥ झालीअंबा॥ १०॥ अवघडआत्मज्ञान बोलणें॥ मीकाहींचबोलेंनेणें॥ शंभुपार्वतीसह्मणे॥ पुढीलग्रंथऐका॥ ११॥ इ तिश्रीमूळस्तंभके॥ ईश्वरपार्वतीसंवादे॥ दत्तात्रयअनुवादे॥ श्रीअवधूत॥ १२॥ ॥ इतिचतुर्थोऽध्यायसमाप्तः॥ ४॥ ॥श्रीशंकरार्पणमस्तु॥ ॥ ॥

श्रीशंकरायनमः॥ ॥आतांनमूदेवईश्वरु॥ जोगिरिजापतीमनोहरु॥ तोवं दीनसर्वेश्वरु॥ आद्यपुरुष॥ १॥ ओंनमोजीसदाशिवा॥ सोहंमूर्तीपरमतत्वा॥ शिवाशंभुमहादेवा॥ नमनमाझें॥ २॥ श्रीगुरूसमर्थभेटे॥ तरीभ्रांतीपटळफि टे॥ दरिद्रफिटे॥ तयांपुरुषांचें॥ ३॥ श्रीगुरूचेकृपादृष्टी॥ झालीपरवस्तुसीभे टी॥ आत्मतत्वागोष्टी॥ अनुभवीजाणती॥ ४॥ जेणेंआत्मतत्वदेखिलें॥ आ णिआपणातेंओळखिलें॥ तयाऐक्यझालें॥ सोहंस्वरूपीं॥ ५॥ तंवआद्यशक्ती

मू·स्तं· अंबिका ॥ पुसेकैलासनायका ॥ दशादेहाचीविवणुका ॥ सांगास्वामी ॥ ६ ॥ आतांप अ·
१४ श्चिमेचेंस्थान ॥ देवीब्रह्मांडांचेसांगेन ॥ विहंगममार्गांचीखुण ॥ बोलेनदेवी ॥ ७ ५
यावरीबोलेशंकर ॥ पंचमुखपरमेश्वर ॥ दशादेहाचाविचार ॥ बोलेनआतां ॥ ८ ॥
त्रिकुटापासूनवरुता ॥ पश्चिममार्गेनिरुता ॥ तेथीलव्यवस्था ॥ बोलेनमी ॥ ९ ॥
तयेंत्रिकुटीतेंनवाटा ॥ दोन्हींमिळालियानिटा ॥ येकींवाटाअव्हाटा ॥ गेलीअसे
॥ १० ॥ आनंदेंबोलेनीळकंठ ॥ प्रथमस्थानतेंत्रिकुट ॥ तेथेंआचारलिंगबळकट
॥ ब्रह्माभक्तु ॥ ११ ॥ पृथ्वीतत्त्वऋषी ॥ ऋग्वेदपरियेसी ॥ पीतवर्णप्रभाकेसी ॥ दि
सेतेथें ॥ १२ ॥ रहस्यमात्रासत्वगुण ॥ आकारपूर्वकपवन ॥ इंद्रियादिविकारजा
ण ॥ स्थूळदेहीं ॥ १३ ॥ जागृतीअवस्थाजाणिजे ॥ वाचावेखरीबोलिजे ॥ विश्व
अभिमानीपाहिजे ॥ त्रिकुटस्थानीं ॥ १४ ॥ उदानहास्वरु ॥ सलोकतामुक्तिनि
र्धारु ॥ अंगाअवसनीविकारु ॥ त्रिकुटींचा ॥ १५ ॥ आतांश्रीहाटींचामातु ॥ श्रो १६
तेअवधानदेतु ॥ मीसांगेनवृत्तांतु ॥ निवडोनियां ॥ १६ ॥ श्रीहाटपीतवर्ण ॥ गु

रुलिंगाचेंस्थान ॥ विष्णुभक्तनिधान ॥ तेथींचापें ॥ १७ ॥ आपरुपीविकारु ॥ र
जोगुणअनुहतस्वरु ॥ यजुर्वेदमनविकारु ॥ तयास्थानकाचा ॥ १८ ॥ सूक्ष्मदे
हजाणणें ॥ मध्यमवाचाबुझणें ॥ स्वप्नअवस्थापाहणें ॥ श्रीहाटभुवनीं ॥ १९
समीपतामुक्ती ॥ तैजसअभिमानीह्मणती ॥ दीर्घमात्राअसती ॥ तेथेंपाहीं ॥
॥ २० ॥ कुंभकुपवनु ॥ प्राणायामगहनु ॥ हेंश्रीहाटिचेंज्ञानु ॥ बोलिलेंजी ॥ २१
आतांगोल्हाटींचाभेदु ॥ परियेसाअनुवादु ॥ तोसांगेननिबंधु ॥ श्रोतेजनहो ॥
॥ २२ ॥ गोल्हाटमंडळ ॥ तेथेंशिवलिंगकेवळ ॥ रुद्रभक्तसदाकाळ ॥ सेवाकरी ॥
॥ २३ ॥ तमोगुणतेठायीं ॥ स्थूलतमात्रापाहीं ॥ सुषुप्तीकरणेंदेहीं ॥ अवस्थाव
र्तें ॥ २४ ॥ तेथेंश्यामवर्णदिसे ॥ तेजरूपीमकारुअसे ॥ पश्यंतिवाचाप्रकाशे ॥
शिवलिंगीं ॥ २५ ॥ रक्तवर्णगोल्हाटस्थान ॥ प्रत्याहारुरेचकपान ॥ बुद्धिवि-
कारुजाण ॥ तयेस्थानी ॥ २६ ॥ प्राणअभिमानआहे ॥ ईश्वररूपपाहें ॥ स्वरू
पतामुक्तिआहे ॥ गोल्हाटमंडळीं ॥ २७ ॥ इतुकेंगोल्हाटिचेंज्ञान ॥ आतांअ

 

नुह्मतींचेंसांगेन॥ हेंजाणतीतेसज्ञान॥ अनुभवीये॥ २८॥ ओंठपोठअहंकार॥ जगत्‍लिंगनिर्धार॥ आपणदेवईश्वर॥ सेवाकरी॥ २९॥ नीळवर्णओंठपीठस्थानक॥ अर्धमात्राआईक॥ परावाचाप्रत्यक्षक॥ जाणिजेतेथें॥ ३०॥ अथर्वणवेदु॥ वायोरूपीप्रसिद्धु॥ तुर्यावस्थाआनंदु॥ ओंठपीठांचा॥ ३१॥ त्र्याहाटपवनजाणिजे॥ चित्तविकारओंकारबीजे॥ सायोज्यनामुक्तिपाविजे॥ श्रीगुरुप्रसादें॥ ३२॥ धारणाआंगदेखा॥ महाकारदेहवोळखा॥ हेंबोलणेंऐका॥ ओंठपीठांचें॥ ३३॥ आतांभ्रमरगुंफाअगोचर॥ जाणतीश्रीगुरुचेकुमर॥ कुळवर्णनिरंतर॥ तयास्थानकाचे॥ ३४॥ भ्रमरगुंफाप्रसादलिंग॥ सदाशिवभक्तचांग॥ तेस्थळींध्यानआंग॥ जाणिजेस॥ ३५॥ सूक्ष्मवेदपांचवा॥ तेथेंअसेतोजाणावा॥ श्रीगुरुरूपेंलक्षावा॥ गुरुपुत्रीं॥ ३६॥ पाहेंपांअवस्थाउन्मनी॥ आकाशरूपीतयेस्थानी॥ असतीपरावाचाज्ञानी॥ जाणेतोचि॥ ३७॥ आकारनिराकारींदिसे॥ ज्ञानदेवतेथेंअसे॥ हेंबोलणेंऐसें॥ भ्रमरगुंफेचें॥ ३८॥ आतांआणिकएक॥ मीबोलेनतेंऐक॥ पेलब्रह्मरं १५

धस्थानक॥महालिंगाचें॥३९॥तयाब्रह्मरंध्राचेंस्थान॥महालिंगाचेंभुवन॥तथेंपु
रुषआपण॥भक्तीकरी॥४०॥तयामहालिंगाचेठायीं॥हर्तविकारनाहीं॥निश्च
ळसमाधिराहीं॥कोटियोगें॥४१॥प्रकाशपरंज्योती॥तेथेंकोटिसूर्यतपती॥व
रीकोटिचंद्रवर्षती॥सीतळपणें॥४२॥तयाब्रह्मरंध्रापासुन॥आलिकडेसाहि
लिंगेजाण॥तेथुनपेल्लिकडेनिर्गुण॥निरामय॥४३॥साहिस्थानकेंजालीं॥तंव
गिरिजेनेंपुसीकेली॥आणिकच्यारीस्थानकेंउपदेशिलीं॥पाहिजेस्वामी॥४४॥
तुह्मीकरीतसागुप्त॥मजऐकावयाचीआर्त॥असेजीबहुत॥प्राणेश्वरा॥४५॥
मगह्मणितलेंत्रिनयनें॥अधःशून्यऊर्ध्वशून्य॥आणिचतुर्थशून्य॥जाणदेवी॥
॥४६॥हेचारीमिळोन॥एकमहाशून्यजाण॥तयाशून्यापासून॥साकारहें॥४७
तयाशून्याचेनिबळें॥राहिलींतिन्हीताळें॥एकवीसस्वर्गअंतराळें॥राहिलेंकेसें॥
॥४८॥शून्यतेंचिवोळखवा॥तयासिनाहींरूपरेखा॥अगोचरअसेखा॥अपरांप
र॥४९॥तेथेंरात्रिनादिन॥जागृतीनास्वप्न॥आपणचिदर्पण॥होऊनिठेला॥

॥४९॥ ऐसेंअभ्यंतरअवधारी॥गौरीतेंह्मणेत्रिपुरारी॥हेंजाणीनलीयाउपरी॥
ज्ञानहोय॥५०॥तंवशक्तिह्मणेजीमहेशा॥माझीविनंतीपरियेसा॥मजकांहीं
उपदेशा॥ब्रह्मज्ञान॥५१॥नवनाडीसोळासंधी॥बाहात्तरकोठेंदेहामधीं॥याचा
विचारकरूनिआधीं॥सांगीजेजी॥५२॥मगआनंदेंबोलेदेवो॥देवीबरवातुझा
भावो॥देहसुद्धिचाअभिप्रावो॥सांगेनतुज॥५३॥मस्तकापासूनचरणावरी॥
नाडीउतरियाभारी॥त्यासर्वशरीरीं॥व्यापूनिअसती॥५४॥पाहेपांशक्तिकुं
डळणीं॥नवनाडीतेंव्यापुनी॥अहंरूपीप्राणवाहनी॥इडापिंगळाझालिया
॥३५५॥कर्णपुष्टापासूनी॥उतरलीगांधारीहस्तीनी॥हातांचियाअंगुष्ठाये
उनी॥राहिल्यादेखा॥५६॥नेत्रपुटापासूननिघालिया॥पुरवाशंखिणीनिघालि
या॥पांचाच्याअंगुष्ठावरीआलिया॥दोन्हीनाडी॥५७॥कुंडळणीचियाशक्ति
थोरी॥अभ्यंतरींहुनीनिघालीवाटचावरी॥नावेंवेगळालियापरि॥विस्तारलिया॥
॥५८॥वज्रदंडमणीकुळमार्गेदाहावी॥सुषुम्नावज्रनाडीजाणावी॥श्रीगुरुमु

रवेंवोळखावी ॥ ज्ञानदृष्टी ॥ ५९ ॥ ऐसा नव नाडींचा विचारु ॥ सोळा सांधींचा प्र
कारु ॥ सांगता होय ईश्वरु ॥ शैलतनयेशीं ॥ ६० ॥ मग ह्मणे पशुपती ॥ सोळा सां
धियांची वित्पत्ती ॥ परियेसीं प्राणशक्ती ॥ चित्त देऊनियां ॥ ६१ ॥ घोटिके गुदगे
कंठ ॥ हे साही सांदे नीट ॥ कैसे निवडी धूर्जटी ॥ सांगता होय ॥ ६२ ॥ मणगट गु
दगे कोंपर ॥ हे सोळा सांधे निर्धार ॥ हृदयकंठ भ्रूसिरा ॥ जाण देवी ॥ ६३ ॥ ऐसि
या सोळा सांधी ॥ जाण पिंडामधीं ॥ बाहात्तर कोठें यामधीं ॥ बोलेन देवी ॥ ६४ ॥
आधारचक्री कोठें ॥ स्वाधिष्ठानाचे बरवंटे ॥ नाभिस्थानीं नीट ॥ दाहा कोठें ६५
अनुहातीं कोठें बारा ॥ कंठीं सोळा अवधारा ॥ अग्निचक्रीं निर्धारा ॥ दोन्हीं कोठें
॥ ६६ ॥ एकें कोठें पन्नास ॥ पश्चिमे एकवीस ॥ ऊर्ध्व एक बहुवस ॥ दिसे कोठें ६७
हे बाहात्तर कोठें देहीं ॥ तंव गिरिजा पुसे कांहीं ॥ या शरीराच्या ठायीं ॥ रक्तबिंदु कि
ती असे ॥ ६८ ॥ मग राउळ वाले सहज ॥ देवी सर्वा घटरज ॥ ओठ पक्के बीज ॥ पिंडीं
असे ॥ ६९ ॥ तंव ह्मणे नसे अंबा ॥ अहो जी देवा मुळारंभा ॥ देवी देहीं असती निळा

रंभा ॥ किती असती ॥ ७० ॥ यावरी बोलिले चंद्रचूडें ॥ बरवें पुसिलें निवाडें ॥ तीन
शें साठ हाडें ॥ शरीरामाजी ॥ ७१ ॥ त्यामाजी एक वाड ॥ जें सवा हात हाड ॥ हें बो
लणें अवघड ॥ बोलिलों असे ॥ ७२ ॥ तें भ्रमरगुंफेमाझारी ॥ सवा हात हाड अव
धारी ॥ न यास वा हाता माझारी ॥ तीन त्यांसि फांटे ॥ ७३ ॥ तंव गिरिजा पुसे वचन
॥ त्यां न तीन हाडें तीं कवण ॥ राउळें करावें निरोपण ॥ प्राणनाथा ॥ ७४ ॥ यावरी-
शंभुदेव बोलिजे ॥ एकीं नाकवट जाणिजे ॥ एकीं कानवट पाहिजे ॥ एकीं चक्ष
वाटा ॥ ७५ ॥ एवं तीन हाडें जाणें ॥ सवा हाता माजी पाहाणें ॥ हें अनंत सिद्धांचें
बोलणें ॥ अगोचररूपें ॥ ७६ ॥ तंव भवानी ह्मणे जी हरा ॥ माझी विनंती अवधारा ॥
दश इंद्रियें प्राणेश्वरा ॥ कवण तीं सांगा ॥ ७७ ॥ तंव पार्वतीचिया बोला ॥ शंभुदे
वो हासिन्नला ॥ ह्मणती बरवा प्रश्न केला ॥ प्राणेश्वरी ॥ ७८ ॥ मग ह्मणे भोळा
चक्रवर्ती ॥ पांच ज्ञानेंद्रियें असती ॥ पांच कर्मेंद्रियें वसती ॥ देहामाजी ॥ ७९ ॥ १७
श्रोत्र त्वचा चक्ष ॥ जिव्हा घ्राण हीं देख ॥ एवं ज्ञानेंद्रियें प्रत्यक्ष ॥ पांच जाण ॥

॥ ८० ॥ ऐकें बुद्धिचेनि संगें वसती ॥ ह्मणोनि बुद्धिंद्रियें ह्मणिजेती ॥ आतां कर्मेंद्रि
यें निगुती ॥ बोलिजेल ॥ ८१ ॥ वाचा पाणि पाद ॥ शिश्न पांचवें गुद ॥ ऐसीं कर्मेंद्रि
यें प्रसिद्ध ॥ जाण देवी ॥ ८२ ॥ तेही पांच कर्में करिती ॥ एकमेकांचे संगें वसती ॥ ह्म
णोनि कर्म इंद्रियें निगुती ॥ ठेविलें नाव ॥ ८३ ॥ ऐसें निरोपिलें महेशें ॥ तंव शक्ती बो
लेसंतोषें ॥ हें अंतःकरण चतुष्टय केसें ॥ सांगा स्वामी यां ॥ ८४ ॥ तंव देवाधिदेव ईश्व
रु ॥ काय बोलिला शंकरु ॥ मन बुद्धी चित्त अहंकारु ॥ चतुष्ट अंतःकरण ॥ ८५ ॥ सं
कल्प विकल्प करी मन ॥ बुद्धी बोधलें लक्षण ॥ अहंकार तो अभिमान ॥ चेतवी-
चित्त ॥ ८६ ॥ एवं चतुष्टय अंतःकरण ॥ देवी सांगीतलें जाण ॥ तंव अंबा आणीक व
चन ॥ पुसे कांहीं ॥ ८७ ॥ जी जी देवा जगव्यापका ॥ कैलासनाथा त्र्यंबका ॥ घडिघडि
एका ॥ जिवासि नाना बुद्धि ॥ ८८ ॥ मग ह्मणे तो जाश्वनीळ ॥ बिंदुस्थानीं अष्टदळ
॥ जीव हंस केवळ ॥ असे देखा ॥ ८९ ॥ सव्य अपसव्य पाहे ॥ हंसाचें भ्रमण आहे
॥ जीव भ्रमन भ्रमत जाये ॥ अष्टही दळीं ॥ ९० ॥ तें अष्टदळ कमळीं ॥ अवधारीं अ

मू·स्तं· ष्टपाकोळी॥ अनेकप्रकारोंनिर्मळी॥ वर्त्तती तेथें॥ ९१॥ त्याअष्टपाकोळिकापाहीं अ
१८ कवणीं॥ ऐकाचित्तदेउनी॥ जाणतेंज्ञानीं॥ वोळखावया॥ ९२॥ हर्षविषादज्जा ५
णिजे॥ भयआनंदओळखिजे॥ उत्सावऐकापाहिजे॥ स्नेहमनिताआणिप्री
ती॥ ९३॥ याअष्टपाकोळिका॥ अष्टदळीअसतीदेखा॥ तयावरीबैसका॥ जीव
आत्मयांचीं॥ ९४॥ जेजेदळींआत्माजाय॥ तेपाकोळिकेवरीबैसोंपाहे॥ तेथेंतें
सीचवासनाहोय॥ अनेकपरींची॥ ९५॥ नानाबुद्धीउपजेजिवासि॥ तेपाकोळि
केचेगुणपर्येसी॥ ऐसेंदेवेंपार्वतीसीं॥ सांगीतलें॥ ९६॥ हेंहोयजोत्रिनयना॥ आ
लेंमाझियामना॥ आतांआणीकएकजगज्जीवना॥ विनंतीअसे॥ ९७॥ रात्रदिव
सशरीरीं॥ पवनयेरझाराकरी॥ कवणअक्षरांभीतरीं॥ येतोजातो॥ ९८॥ मग
ह्मणितलेंशंकरें॥ देवीहंसदोन्हीअक्षरें॥ त्रैलोक्यव्यापकथोरें॥ अगोचरतें॥
॥ ९९॥ हंयेणेंअक्षरेंबाहेरी॥ संयेणेंअक्षरेंभीतरीं॥ वायोसंचरेशरीरीं॥ जाण १०
देवी॥ १००॥ हंकारतोशिवबोलिजे॥ सकारतोशक्तिजाणिजे॥ एवंदोन्हींअक्ष

रेंबोलिजे ॥ शिवशक्ती ॥ १ ॥ हंदक्षिणदळींपिंगळेचाठायींअसे ॥ सकारवामदळीं
इडेच्याठायींप्रकाशे ॥ ऐसेंहोउनियांअसे ॥ जाणदेवी ॥ २ ॥ इतुकेंशंभुदेवबोलि
ला ॥ पार्वतीसीअनुभवझाला ॥ मगआणीकप्रश्नकेला ॥ पुसावयाचा ॥ ३ ॥ चा
रीवाचाकवणी ॥ जन्मपावलियाकवणेस्थानी ॥ सांगाजीशूळपाणी ॥ मजप्रती
॥ ४ ॥ मगबोलिलेत्रिपुरारी ॥ तूंभलीगुणवंतीनारी ॥ परापश्वंतिमध्यमावैरव
री ॥ याचवाचा ॥ ५ ॥ मनेंसहितपवन ॥ गगनींआदळेजाउन ॥ तेथींचेध्वनीपा
सोन ॥ पराजन्मली ॥ ६ ॥ तेथुनपवनमुरडला ॥ पश्चिमनळेंभरला ॥ काकिमु
खासिआला ॥ तेथेंपश्वंतिजन्मली ॥ ७ ॥ तेथोनपवनउदेला ॥ तोहृदयासि
आला ॥ तेथुनीजन्मला ॥ मध्यमेसी ॥ ८ ॥ तेथोनिउदेलापवन ॥ तोनासिका
सिआलाटाकोन ॥ तेथेवैरवरीसिजन्म ॥ झालापाहीं ॥ ९ ॥ एवंवाचाचारी ॥ प
रापश्वंतिमध्यमावैरवरी ॥ पांचवीनिराकारी ॥ अनुर्वाचा ॥ १० ॥ ऐसासोरस
भेदपरमार्थ ॥ देवसांगेअनादिसिद्ध ॥ तंवपार्वतीसझालाबोध ॥ ऐकोनियां ॥

मू·स्तं· ॥११॥जोहाग्रंथवाची॥नयासीभ्रांतीकेंची॥गोडीपरब्रह्माची॥लागेलतया॥१२॥ अ
१९ पुनतीह्मणेपरमपुरुष॥पार्वतीससांगेमहेश॥तुह्मींऐकासावकाश॥ह्मणेशूल ५
पाणी॥१३॥ इतिश्रीमूळस्तंभके॥ईश्वरपार्वतीसंवादे॥दत्तात्रयअनुवादे॥अव
धूत॥११४॥ ॥श्रीशंकरार्पणमस्तु पंचमोध्यायसमाप्तः॥ ७॥ ७॥

श्रीशंकरायनमः॥ ॥तंवहिमवंताचीबाळा॥पार्वतीह्मणेजीजाश्वनीळा॥मातें
सांगाअठ्ठावीसकळा॥चंद्रसूर्याच्या॥१॥चंद्रकोठेंवस्तीकरी॥सूर्यवसेकवणि
येघरीं॥याचाविचारत्रिपुरारी॥सांगामज॥२॥मगह्मणेकैलासनाथ॥गौरीवर
वीपुसिलीमात॥चंद्रसूर्याचावृत्तांत॥सांगेनतुज॥३॥चद्रकांताळुकाकमळीं॥
वसेगगनमंडळीं॥कैसादिसेसोळाकळीं॥शोभिवंत॥४॥त्यासोळाकळाकवणी॥
॥ऐकेंहिमवंताचियेनंदिनी॥सांगेनचित्तदेउनी॥ऐकपांतु॥५॥ऐकेंसोळाक- १
ळांचींनावें॥शंखिनी १ पद्मिनी २ लक्ष्मिणी ३ कामिनी ४ पक्षिणी ५ व्यापिनी

६ विद्या ७ मोहिनी ८ प्रमोदनी ९ मिथुनी १० विकाशा ११ अमृता १२ अमृतसं
जीवनी १३ नीचवनी १४ ज्ञानदृष्टी १५ पाह्यावी १६ अनुभवीये ॥ यासोळा
कळांसहितशशी ॥ अधोमुखधांवेपूर्वेसी ॥ शंभुह्मणेपार्वतीसी ॥ परियेसी
आतां ॥ ६ ॥ आतांबारांकळांसहित ॥ नभींमूळींसूर्यनाथ ॥ तेथेंवसेआदि-
त्य ॥ द्वादशकमळीं ॥ ७ ॥ त्याबारांकळांचीनावें ॥ सांगिजेतीस्वभावें ॥ मनए
काग्रकरावें ॥ प्राणप्रिये ॥ ८ ॥ जालिनी १ कर्णी २ दहनी ३ दीपिणी ४ ज्योति
नी ५ तेजिनी ६ विद्या ७ मोहिनी ८ जीतणी ९ शंखिनी १० प्रकाशिनी ११ दीप
कळिका १२ याबारांकळांसहितदिनकर ॥ पश्चिमेसचालेनिर्धार ॥ पश्चिमे
सीदिनकर ॥ जातअसे ॥ ९ ॥ शक्तिह्मणेशंभुराया ॥ बारासोळासांगीतालि
या ॥ सत्रावीकळास्वामियां ॥ सांगावीकवणते ॥ १० ॥ मगह्मणतीत्रिनयन
॥ सत्रावीकळाजिव्हाजाण ॥ तयेनावनिरंजन ॥ ठेविलेंअसेदेवी ॥ ११ ॥ ते
शक्तिचेनिपाहे ॥ हाप्राणतयेकरोनीआहे ॥ ओंठह्मानदेहे ॥ वादवीतअसे १२

मू·स्तं· तेसत्रावीचंद्रकळा॥तीपासूनअमृताचाजिव्हाळा॥येतअसेघळघळां॥सुखा अ
२० माजी॥१३॥तेपंचप्राणातेंवाढवी॥तेसत्रावीजाणदेवी॥ज्ञानदृष्टीवोळखावी ६
॥सोळामाजी॥१४॥जियेचेनिआधारबळें॥पंचभूतेंदिसाळें॥एकवीसस्व
र्गअंतराळें॥डोलतीआनंदें॥१५॥तेअमृतसंजीवनी॥तेसत्रावीजननी॥
योगियाचेध्यानी॥रात्रदिवस॥१६॥ऐसीतेसत्रावीजाणिजे॥शंकरह्मणेवो
गिरिजे॥हेंज्ञानबुझोनिराहिजे॥आपआपणियां॥१७॥तंवपार्वतीआणिक
पुसे॥देवाचंद्रकोणेआंगीवसे॥सूर्यकोणेआंगीअसे॥प्राणनाथा॥१८॥म
गबोलिलादेवशंकर॥देवीडावेआंगीचंद्र॥उजवेआंगींदिनकर॥सूर्येनाथ॥
॥१९॥मनतोचिचंद्रमाजाण॥पवनसूर्यभान॥यादोहीपासून॥पिंडचाले
॥२०॥मनपवनचंद्रसूर्यसहज॥हेनिजवर्मबुझ॥हेंगुह्यगुजनुज॥सांगत
असें॥२१॥एकाचीअर्धीकउणीगती॥दोघेसांवरुनिनेती॥देहातेंधरोनिव
र्तेती॥चंद्रसूर्य॥२२॥इडावामभागीं॥पिंगळादक्षिणांगीं॥सुखुम्नाआत्म २

रंगी ॥ मध्येंअसे ॥ २३ ॥ इडातेचिगंगाभागीरथी ॥ पिंगळातेचियमुनाह्मणती ॥ सुषुम्नासरस्वती ॥ तिन्हींबोध ॥ २४ ॥ इडापिंगळासुषुम्ना ॥ तेचिगंगायमुना ॥ मस्तकापासोनसरस्वतीजाणा ॥ रचनायाची ॥ २५ ॥ हेंहोयजीशंकरराजा ॥ बरवेंसांगीतलेंबीजा ॥ आतांप्रश्नमाझा ॥ एकअसे ॥ २६ ॥ देहींसप्तद्वीपावती ॥ देवाकोठेंअसती ॥ ऐसीतुझीविनंती ॥ करजोडोनियां ॥ २७ ॥ सप्तद्वीपेंतींकोण ॥ तेंराउळेंकीजेनिरोपण ॥ आह्मांप्रतीसांगणें ॥ कृपाबुद्धी ॥ २८ ॥ ऐसीऐकोनिविनंती ॥ संतोषलागिरिजापती ॥ मगह्मणेयाचास्थिती ॥ सांगेनआतां ॥ २९ ॥ जंबुद्वीप १ शंखद्वीप २ कुशद्वीप ३ क्रौंचद्वीप ४ श्वेतद्वीप ५ पुष्करद्वीप ६ शाल्मद्वीप ७ सातवेंहे ॥ ३० ॥ ऐसीसप्तद्वीपावती ॥ आपुलियेदेहींवसती ॥ कवणद्वीपाचीवस्ती ॥ कोठेंअसे ॥ ३१ ॥ आनंदेंबोलेईश्वररूप ॥ अस्तित्वाठायींजंबुद्वीप ॥ पंचमुखनिर्विकल्प ॥ सांगतअसे ॥ ३२ ॥ मेदेंशंखद्वीपजाण ॥ मांसींकुशद्वीपगहन ॥ शिरींक्रौंचद्वीपनिर्वाण ॥ वसेपाहीं ॥ ३३ ॥ त्वचाशाल्मलीद्वीप-

मू॰ स्तं॰ २१

जाणिजे ॥ रोमीश्वेतद्वीपपाहिजे ॥ नाभिस्थानीदेखिजे ॥ पुष्करद्वीप ॥ ३४ ॥ एवं
सप्तद्वीपेंजाण ॥ हेंविवेकदर्पणीचेंबोलणें ॥ साहाचक्रेंसाहादर्शनें ॥ तेंचिबो
लिजे ॥ ३५ ॥ तंवअंबाप्रश्नकरी ॥ पुनतीपुनतीपरोपरी ॥ ह्मणेईश्वराअवधा
री ॥ प्रश्नमाझा ॥ ३६ ॥ पांचमुद्रात्याकवणी ॥ सांगाकृपाकरोनी ॥ कवणमुद्रा
कवणियेस्थानी ॥ वसेपिंडीं ॥ ३७ ॥ मगदेवह्मणेसुंदरी ॥ खेचरीभूचरीचांच
री ॥ अगोचरीअलक्षपांचवीमुद्राजरी ॥ जाणिजेदेवी ॥ ३८ ॥ खेचरीसुद्रेचें-
स्थानक ॥ हेंमुखमंडळदेख ॥ बत्तिसामाजीस्फुरेरव ॥ वर्त्तनकेंसी ॥ ३९ ॥ भूच
रीमुद्रामनोहर ॥ तियेचेंनासिकघर ॥ तेथेंवसेनिरंतर ॥ जाणिजेपें ॥ ४० ॥ चां
चरीमुद्रानेत्रकमळीं ॥ सर्वत्रअवघेंन्याहाळी ॥ पाहेंपांचस्फुरमडळीं ॥ राहिली
असे ॥ ४१ ॥ अगोचरीमुद्राश्रवणींवसे ॥ गीतशब्दऐकतसे ॥ अगोचरहोउनी
प्रकाशे ॥ कर्णमंडळीं ॥ ४२ ॥ अलक्षमुद्राअपरांपर ॥ गगनचक्रींतिचेंघर ॥
उन्मनीनिरंतर ॥ नांदेतेथें ॥ ४३ ॥ यापांचमुद्रांचीवोळखी ॥ करिजेयोगेश्वरी

अ
६
२

निकी ॥ ऐसेंदेवेंआपुलेमुखीं ॥ सांगीतलेंअसे ॥ ४५ ॥ यावरीबोलेउमा ॥ अहो
जीदेवापरब्रह्मा ॥ अव्यक्तरूपनिजधामा ॥ जगज्योती ॥ ४५ ॥ जोम्यांप्रश्नके.
ला ॥ तोतुह्मीनिरोपिला ॥ आतांचहूंखाणीचाविचारमजला ॥ सांगितलापाहि
जे ॥ ४६ ॥ माझीविनंतीकाहीं ॥ चंद्रचूडासांगोनदेयीं ॥ चारीखाणीकवणेठायीं
॥ पिंडीं असती ॥ ४७ ॥ मगपंचवदनशंभुराज ॥ ह्मणेदेवीस्वेदजअंडज ॥ जारज
उद्भिज ॥ चतुःखाणी ॥ ४८ ॥ देखेवेंस्वेदजखाणीअसे ॥ हाडींअंडजखाणींवसे ॥
मांसींजारजखाणींदिसे ॥ रोमींउद्भीजखाणजाणदेवी ॥ ४९ ॥ ऐसियाचतुःखा-
णी ॥ असतीदेहस्थानी ॥ तंवआदिशक्तिभवानी ॥ आणीकपुसे ॥ ५० ॥ आतांस
प्तसागरजाण ॥ उमापुसेआपण ॥ महेश्वरेंनिरोपण ॥ करावेंमज ॥ ५१ ॥ सप्तसा
गरपिंडामाजी ॥ कवणेस्थानींअसतीजी ॥ मजप्रतीसांगाजी ॥ कृपाकरोनियां
॥ ५२ ॥ ऐकोनिपार्वतीचियागोष्टी ॥ कायबोलिलेधूर्जटी ॥ ह्मणेतूंभलीपुसिली
गोष्टी ॥ ज्ञानदेवी ॥ ५३ ॥ सप्तसागरांचीमात ॥ सांगेनह्मेयेसावचित्त ॥ आपण

विश्वनाथ॥सांगताझाला॥५४॥नीरससमुद्र१क्षीरससमुद्र२दधिसमुद्र३क्षारसमु
द्र४रत्नागरससमुद्र५मनससमुद्र६मदनसमुद्र७सातवाजाणदेवी॥५५॥ऐसे
समससमुद्र॥यांचाबोलणेंविचार॥तोपरियेसाप्रकार॥सांगेनमी॥५६॥नेत्रीं
नीरससमुद्रदेखा॥सन्नावीक्षीरससमुद्रवोळखा॥नासिकींदधिसमुद्रसरेखा॥पा
हिजेस॥५७॥मूत्रींक्षारससमुद्रपाहे॥नाभींरत्नाकरसमुद्रआहे॥हेंवर्मबुझेनी
राहें॥एकनत्लीं॥५८॥ह्रदयींमनससमुद्रअसे॥मस्तकींमेदसमुद्रवसे॥हेस
मससमुद्रऐसे॥पिंडींजाणावे॥५९॥मगगिरिजाबोलेउल्हासें॥आतांएकनि
रोपिजेमहेशें॥पदपिंडरूपातीतकैसें॥सांगादेवा॥६०॥पदकासयातेंह्मणिजे
॥पिंडकवणातेंबोलिजे॥रूपगेसेंनावठेविजे॥कवणासीजी॥६१॥रूपातीततें
काय॥याचीकैसीविवंचनासोय॥कैसेंव्याकरणआहे॥याचेंदेवा॥६२॥मग
ह्मणेजगन्निवासु॥पदपरमात्माजाणिजेस॥तोचिओंकारआद्यपुरुषु॥आ २२
द्यबीज॥६३॥पिंडह्मणिजेकुंडलणीशक्ती॥सर्वजयेचिविस्पत्ती॥दशवायो

गुणभ्रांनी ॥ तयेस्थानी ॥ ६४ ॥ रूपह्मणिजेनादबिंब ॥ कळाज्योतीवर्णभेद ॥
हेंसाकारप्रसिध्ध ॥ रूपादिक ॥ ६५ ॥ रूपातीततेंनिरंजन ॥ निराकारतेंनिर्गुण
॥ तेंअरूपनिर्वाण ॥ निरामय ॥ ६६ ॥ एवंपदपिंडऐसेंबोलिलें ॥ रूपरूपातीतसां
गीतलें ॥ तंवपार्वतीनेंपुसिलें ॥ आणिकएक ॥ ६७ ॥ चारिमुक्तित्याकवणसांगाव्या
॥ कवणमुक्तिकैसीवोळखावी ॥ याचीमजपडलीगोवी ॥ हेंसांगावेंजी ॥ ६८ ॥ मग
शंभुझाल्याबोलत ॥ सलोकतासमीपता ॥ स्वरूपतासायोज्यता ॥ मुक्तिचारी ६९
ज्यादेवाचीभक्तिकीजे ॥ त्यादेवलोकाजायिजे ॥ सलोकतामुक्तिजाणिजे ॥ मुक्ति
पाहीं ॥ ७० ॥ बहुतमान्यपणें ॥ देवासमीपराहणें ॥ समीपतापावणें ॥ मुक्तिदेवी
॥ ७१ ॥ त्यादेवाचियारूपासारिखें ॥ आपणहोईजेविशेषें ॥ तेस्वरूपताओळखें
॥ मुक्तिदेवी ॥ ७२ ॥ ऐसाचहूंमुक्तिंचाभेद ॥ देवसांगेअनादिसिद्ध ॥ तंवगिरिजा
आणिकशब्द ॥ बोलिलीकांहीं ॥ ७३ ॥ जयासींश्रीगुरुकृपाघडे ॥ तोचिहामूळस्तं
भपदे ॥ त्यासीज्ञानहोयरोकडें ॥ ततक्षणीं ॥ ७४ ॥ तंवबोलिलीअंबाभवानी ॥

देवापरियेसीविनवणी ॥ अष्टगिरीकवणेस्थानीं ॥ असतीदेहीं ॥ ७५ ॥ इतिश्री
मूळस्तंभके ॥ ईश्वरपार्वतीसंवादे ॥ दत्तात्रयअनुवादे ॥ अवधूत ॥ ७६ ॥ ॥
॥ श्रीशंकरार्पणमस्तु ॥ ॥ इतिषष्ठोऽध्यायसमाप्तः ॥ ६ ॥ ७ ॥ ७ ॥

---

श्रीशंकरायनमः ॥ ॥ तंवशूळपाणिह्मणेसुंदरी ॥ मनएकचित्तकरी ॥ देहीं
असतीअष्टगिरी ॥ तेंसांगेनआतां ॥ १ ॥ पूर्वेउदयगिरीअसे ॥ पश्चिमेअस्तगि
रीप्रकाशे ॥ उत्तरेकनकगिरीप्रकाशे ॥ दक्षिणेशंखगिरीजाण ॥ २ ॥ नैर्ऋत्येना
रायणगिरीनिधान ॥ वायव्यकोनीकनकगिरीगहन ॥ ईशान्येमहिगिरीजा
ण ॥ महाथोर ॥ ३ ॥ आग्नेयकोनींमहिगिरीपर्वत ॥ देहींअसतीनिभ्रांत ॥ त्याअ
ष्टगिरीमाजीपर्वत ॥ मेरुएक ॥ ४ ॥ तंवगिरिजाबोलेवचन ॥ कैसेंमेरुचेंलक्षण ॥
सांगामजलागोन ॥ नीळकंठा ॥ ५ ॥ मगह्मणेमहेश्वर ॥ आतांमेरुचाविस्तार
॥ सांगेनवोनिर्धार ॥ प्राणशक्ती ॥ ६ ॥ सकळगिरिवरांमाजिएक ॥ महामेरुमो

धनाध्यक्ष॥ त्यामेरूच्या आधारें लोक॥ नांदत असती॥ ७॥ तो मेरू कनकाचा आ
हे॥ तीन स्वर्गें उंच पाहें॥ ऐसें बोलिलें आहे॥ शास्त्रमार्गीं॥ ८॥ ब्रह्मा नरेंद्रें त्या
मेरूशीं॥ नवटंके परियेसीं॥ तेथें नवग्रह अहर्निशीं॥ नांदते देखा॥ ९॥ तो त्रिकों
नी मेरू गंभीर॥ तो भूमादेवीचा कुमर॥ तो पंचप्रकार॥ उगवला असे॥ १०॥ आ-
तां मेरूची संख्या बोलेन॥ बारा अर्बुदें नवरवर्गें जाण॥ सात सहस्त्र योजन॥ वि
स्तार त्याचा॥ ११॥ अवधियां पर्वतांसि आधीं॥ त्या मेरूची चतुर्लक्ष रुंदी॥ सोळा
सहस्त्र भूमीमधीं॥ रुतला असे॥ १२॥ मेरूच्या दक्षिणभागीं कैसें॥ अमरावती
नगर असे॥ नवसहस्त्र गावें वसे॥ तेथें देव नांदती॥ १३॥ त्या मेरूची प्रदक्षिणा॥
चंद्रसूर्य करिती आपण॥ सप्तऋषी भ्रमण॥ करिताति तारांगणें॥ १४॥ त्या मेरू
च्या माथ्यावरी॥ तीन शिखरें अवधारी॥ त्या शिखरांची थोरी॥ अगोचर पैं॥ १५
पाहें पूर्वचें शिखर॥ योजन तेरा सहस्त्र॥ इतकें वसे निरंतर॥ जाणिजे पैं॥ १६॥ त
यातें सत्यलोक ह्मणती॥ तेथें ब्रह्मा राजा नृपती॥ ब्रह्मलोक नांदती॥ तयें शिख

री ॥ १७ ॥ आतांपश्चिमेचेंशिखरबरवें ॥ बोलिलेंनेंस्वभावें ॥ तेंसातसहस्त्रगावें ॥
नांदतअसे ॥ १८ ॥ तयातेंवैकुंठबोलिजे ॥ तेथेंविष्णूनेंराज्यकीजे ॥ विष्णुलोक
पाहिजे ॥ नांदतीतेथें ॥ १९ ॥ आतांउत्तरेचेंशिखरकैसें ॥ एकुणतीससहस्त्रगावें
वसे ॥ एवढेंथोरअसे ॥ अपरांपर ॥ २० ॥ तयातेंकैलासह्मणिजे ॥ तथेंनांदतीशि
वराजे ॥ रुद्रलोकवसतीवोजे ॥ तयेस्थानीं ॥ २१ ॥ ऐसींतीनशिखरेंझालीं ॥ मे
रूचीस्तुतीकेली ॥ तंवपार्वतीनेंपुसीआरंभिली ॥ आणीकअचाट ॥ २२ ॥ अन्नउ
दकसेविजेतसे ॥ उदरींकोणेंठायींजाऊनिबैसे ॥ ऐसाअनुभवमहेशें ॥ निरोपा
वा ॥ २३ ॥ तंवतोज्ञानियाचाराव ॥ कायबोलिलादेवाधिदेवो ॥ ह्मणेबरवाउ-
त्सावो ॥ काढिलादेवी ॥ २४ ॥ पोटीं उजवेआंगींजाण ॥ उदकबैसेआपण ॥ डा
वेआंगींअन्न ॥ जाऊनिबैसे ॥ २५ ॥ पोटींवामांगींमुताचापोटळा ॥ पोटींदक्षिणां
गींमळाचाकोथळा ॥ ह्यामेदविरळा ॥ बुझेकोणी ॥ २६ ॥ पोटांगाजींजठराग्नी २१
वसे ॥ अवघेंभस्मकरीतसे ॥ अन्नउदकग्रासे ॥ तयाचेंमुखीं ॥ २७ ॥ जेव्हांतो

चेतवी अग्नी ॥ नेव्हांनो मागे अन्नपाणी ॥ जाणोनि पडे तयाचे वदनी ॥ तेणें तोस
रिवया होय ॥ २८ ॥ ऐसा परमार्थ विचार ॥ देवीसि सांगे कर्पूरगौर ॥ पार्वती संत
तोष थोर ॥ मानिला मनीं ॥ २९ ॥ मग नो त्रिभुवनरावो ॥ शंभु देवाधिदेवो ॥ सप्त
पाताळांचा उगवो ॥ करिता झाला ॥ ३० ॥ अतळ १ वितळ २ सुतळ ३ महातळ
४ रसातळ ५ पाताळ ६ तळातळ ७ सातवें ॥ ३१ ॥ एवं सप्त पाताळें बोलिजे ॥ कं
ठापासूनि खालती पाहिजे ॥ कवण पाताळ कवणे ठायीं गिरिजे ॥ असे तें ऐकें
॥ ३२ ॥ या सप्त पाताळीं अतळ ॥ नयाऊर्ध्व वितळ ॥ घोटी सुतळ ॥ स्थिरावलें ॥ ३३
पोटरिया महातळ ॥ संधी वितळ ॥ जंघा रसातळ ॥ पाताळ तें गुह्य ॥ ३४ ॥ ऐसें
ऐकोनियां वचन ॥ देवी बोले पंचानन ॥ ह्मणे भलें स्फुरलें ज्ञान ॥ तुजलागीं ॥ ३५ ॥
पहिल्या पाताळाभीतरी ॥ पुष्पावती नाम नगरी ॥ तथें रक्तनागर राज्य करी ॥
तेथींचे पें ॥ ३६ ॥ दुसऱ्या पाताळाभीतरी ॥ शैल्यपुर नाम नगरी ॥ तथें गंधनाग
र राज्य करी ॥ आनंदेसी ॥ ३७ ॥ तिसऱ्या पाताळामाजि गहन ॥ तथें रक्तमकरा

मू·स्तं· जानिधान॥श्रीधरपूरपाटण॥तेथेंराज्यकरी॥३८॥ववथ्यापानाळांमाजीदेख ७
२५ ॥वातकापूरनगरसरेख॥तेथेंगंधमळराजाप्रत्यक्ष॥नांदेआनंदे॥३९॥पांच ७
वेंपाताळकैसें॥रुद्रावतीनगरवसे॥इशान्यराजानागवसे॥तयेंस्थानीं॥४०॥
साहावेपाताळींनिर्धारीं॥कंजनपुरनामनगरी॥तयेंचरणचारुराज्यकरी॥राजा
तेथींचा॥४१॥सातवेपाताळींदेख॥उग्रावतीनगरएेक॥तेथेंशत्रुनळराजासरू
रेख॥नांदेदेख॥४२॥ऐसींसप्तपानाळें॥पाठींयेकवीसमणिकुळें॥तेथेंयेकवी
सस्वर्गदिसाळें॥ह्मणिजेदेवी॥४३॥तंवपार्वतीह्मणेपुसती॥एकवीसस्वर्गी
चीस्थिती॥देवाकवणेस्वर्गीनांदती॥कवणराजे॥४४॥ज्योतिस्वर्ग१सप्तस्वर्ग
२निर्मळस्वर्ग३भारस्वर्ग४प्रकाशस्वर्ग५रम्यस्वर्ग६सहजस्वर्ग७निजस्वर्ग८
सिद्धस्वर्ग९प्रळयस्वर्ग१०आनंदस्वर्ग११नित्यस्वर्ग१२अनीनस्वर्ग१३अनन्त
स्वर्ग१४अढळस्वर्ग१५अमळस्वर्ग१६विमळस्वर्ग१७प्राज्ञेस्वर्ग१८शुद्धस्व २
र्ग१९सदोदितस्वर्ग२०॥स्वयंभस्वर्ग२१॥एवंएकवीसस्वर्गे॥ग्रंथींसांगीत

लेंभसंगें॥ नवशक्तिह्मणेरंगेरंगें॥ बोलास्वामी॥ ४५॥ ऐसाएकवीसस्वर्गांचाभेदु
॥ सांगीतलाशद्धेंशद्ध॥ गिरिजेसिझालाबोधु॥ ऐकोनियां॥ ४६॥ नवह्मणेपार्व
ती॥ अहोजीदेवापशुपती॥ आतांमाझीफिटलीभ्रांती॥ संसाराची॥ ४७॥ अ
नुभवमनासिआला॥ ज्ञानबोधझाला॥ भ्रांतीपदरफिटला॥ तुमचेनिप्रसादें॥
॥ ४८॥ संपूर्णझालाशिवनिबंधु॥ ईश्वरपार्वतीसंवादु॥ देहींचाअनुवादु॥ नेथो
निझाला॥ ४९॥ हाश्रीशिवनिबंधु॥ ऐकोनिवर्ततीसाधु॥ पापियानावडेशिवबो
धु॥ शिवनीतीचा॥ ५०॥ जेंपडेपुरुषांसिसांकडें॥ तेंकीजेहेंउघडें॥ नेमुनियां
धडपुढें॥ मगवाचिजे॥ ५१॥ इतिश्रीमूळस्तंभके॥ ईश्वरपार्वतीसंवादे॥ दत्ता
त्रयअवधूत॥ अनुवादला॥ ५२॥ ॥ इतिमूळस्तंभग्रंथसमाप्तः॥ ॥ श्रीसांब
सदाशिवार्पणमस्तु॥ ७॥ ७॥ ७॥ ७॥ ७॥

श्रीगणेशायनमः॥ ॥श्रीसद्गुरूचीआरतीप्रारंभः॥ ॥सगुणहेआरतीनिर्गुण
ओवाळूं॥कल्पनेचेंघृतघालूंनिदीपपाजळूं॥१॥ओवाळूंआरतीसद्गुरुनाथा
॥भावेंचरणकमळावरीठेउनिमाथा॥धृ०॥अविद्येचीकाजळीखुडोनियांसा
डूं॥आशामनशातृष्णाकामक्रोधकुरवंडी॥ओवा०॥२॥सद्गुरूचेंपूजनकेलेंषो
डशउपचारीं॥रामनंदजीवनमुक्तझालेसंसारीं॥ओवा०॥३॥ ॥आरतीत्रि
त्रिंबकराजाची॥ ॥जयदेवजयदेवजयत्रिंबकराजाओवाळूंआरतीआपुलि
याकाजा॥धृ०॥विभूतिभूषणभूषितदुल्लभपेंशोभागजचर्मपरिधानउमा
वल्लभा॥दिनउद्धारणसहजतिसकळुभापूर्णइंदुभाळिंमहिकटिप्रभा॥जय
देव०॥१॥कुशावर्त्तीचेंस्नानपैंझालेंत्रिंबकरायाचेंदर्शनझालें॥जन्मोज=
न्मीचेंपापजळालेंतुझेस्वरूपेकरोनिदेहशुद्धझालें॥जयदेव०॥२॥विभूति
भूषणत्रिपुंड्रशोभेललाटींरुद्राक्षांच्यामाळाशोभतीकंठीं॥अंधकासुरम
र्दीनितोत्वांजगजेठीभक्तांकारणअवतारगंगेच्यातटीं॥जयदेव०॥३॥अ २

कळमहिमालुझीनकसीकवणाब्रह्मगिरिमध्यैंकैलासराणा॥स्नानकरितां
दुयजळलीभावनाएकपरमानंदश्रीगुरुच्याचरणा॥जयदेव०॥४॥ ॥
॥ ॥इतिआरतीसमाप्तः॥ ॥इतिमूळस्तंभससमाप्तः॥ ॥शके१७८२रौद्रना
मसंवत्सरेभाद्रपदशुद्ध१२भौमवासरेनहिनेइदंपुस्तकंसमाप्तम्॥ ॥
हेंपुस्तकमुंबइंतबापूसदाशिवशेटशेटयेहेंगिष्टेश्रीवर्धनकरयाणींआपल्या
छापरवान्यानछापिलें॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

अध्यायांच्याओव्यांचीसंख्या

| | | | |
|---|---|---|---|
| अध्यायपहिला | १६२ | अध्यायपांचवा | ११५ |
| अध्यायदुसरा | ४१ | अध्यायसाहावा | ७७ |
| अध्यायतिसरा | ५५ | अध्यायसातवा | ५२ |
| अध्यायचवथा | १२ | एकंदरसंख्या | ५१४ |

इतिमूलस्तंभःसमाप्तः